**राज्यात बालकांच्या कल्याणासाठी सुरू असलेल्या सर्व निवासी व अनिवासी तसेच अनुदानित व विनानुदानित तत्वावरील संस्थांचे नोंदणीकरण करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांक-बालगृ-२०१४/प्र.क्र.९९/का-८

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख-३० जुलै, २०१४.

**प्रस्तावना :-**

राज्यात बालन्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २००० व सुधारित अधिनियम २००६ मधील कलम ३४(१) मधील तरतुदीनुसार बालकांच्या निवासी व अनिवासी तसेच अनुदानित व विनानुदानित तत्वावरील संस्था बालकांच्या कल्याणाकरिता चालविण्यात येतात. अशा सर्व संस्थांचे नोंदणीकरण होणे आवश्यक आहे. तथापि राज्यात मोठ्या प्रमाणावर बालकांच्या कल्याणाकरिता सुरू असलेल्या निवासी व अनिवासी तसेच अनुदानित व विनानुदानित अनोंदणीकृत संस्था कार्यरत आहेत. राज्यात शासनाकडे नोंदणीकृत नसलेल्या परंतु अनधिकृतपणे चालविण्यात येणाऱ्या बालकांच्या संस्थेत मोठ्या प्रमाणावर गैरव्यवहार  घडत असल्याबाबतच्या घटना नुकत्याच उघडकीस आलेल्या आहेत. उदा.चंद्रप्रभा चॅरिटेबल ट्रस्ट,कर्जत. अशा घटनांमुळे महिला व बालविकास विभागाची नाहक बदनामी होऊन घटनेची संपूर्ण जबाबदारी या विभागावर पडते परंतु प्रत्यक्षात अशा संस्थांवर नोंदणीकृत नसल्यामुळे  विभागाद्वारे कारवाई करता येत नाही. त्यामुळे अशा संस्था महिला व बालविकास विभागाच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखाली येणे आवश्यक आहे. त्याकरिता राज्यात बालकांच्या कल्याणासाठी कार्यरत असलेल्या सर्व संस्थांचे नव्याने नोंदणीकरण होणे आवश्यक आहे. या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

बालन्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २००० व सुधारित अधिनियम २००६ मधील कलम ३४(१) मधील तरतुदीनुसार बालकांच्या कल्याणाकरिता चालविण्यात येणाऱ्या बालकांच्या निवासी व अनिवासी तसेच अनुदानित व विनानुदानित तत्वावरील सर्व संस्थाची नव्याने नोंदणी करणे आवश्यक असल्याने बालकांच्या कल्याणाकरिता राज्यात सुरू असलेल्या खालील सर्व संस्थांनी नोंदणी करणे आवश्यक आहे.

१. ज्या संस्था फक्त मुलांकरिता संस्था चालवितात अशा सर्व संस्थांनी नोंदणीकरण करणे आवश्यक आहे.

२. ज्या संस्था फक्त मुलींकरिता संस्था चालवितात अशा सर्व संस्थांनी नोंदणीकरण करणे आवश्यक आहे.

३. ज्या संस्था मुलां-मुलींकरिता संस्था चालवितात अशा सर्व संस्थांनी मुला व मुलींचे वेगवेगळे नोंदणीकरण करणे आवश्यक आहे.

४. सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून पुढील दोन महिन्याच्या आत अशा संस्थांनी नोंदणीकरण करणे आवश्यक राहील.

५. ज्या संस्था शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून पुढील दोन महिन्यांच्या आत नोंदणीकरण न करता मुलांना संस्थेत ठेवतील अशा संस्थावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

या विषयी विभागाने स्वयं नोंदणी (Self Registration) ची पध्दत अवलंबिली आहे. त्यामुळे नोंदणीसाठी शासनाच्या कोणत्याही कार्यालयात न जाता खालील वेबसाईटवर स्वत: नोंदणी करता येईल.

राज्यात बालकांच्या कल्याणाकरिता बालन्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २००० व सुधारित अधिनियम २००६ मधील कलम ३४(१) मधील तरतुदीनुसार सुरू असलेल्या सर्व संस्थांनी www.icds.gov.in/wcdchild यासंकेतस्थळावर असलेल्या ऑनलाईन नोंदणी प्रणालीवर स्वत: नोंदणी करावी.नोंदणी करताना/ माहिती भरताना कोणत्याही प्रकारची अडचण उद्भवल्यास त्यासंदर्भात मार्गदर्शन करण्यासाठी Helpline ची व्यवस्था आयुक्त, महिला व बालविकास,पुणे यांचेकडून स्वतंत्रपणे करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०११२२४१६९२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uke Ujjwal

Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2014.08.07 12:36:29 +05'30'

**उज्ज्वल उके**
प्रधान सचिव

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. मा.मंत्री,महिला व बाल विकास ,यांचे खाजगी सचिव.
३. मा.प्रधान सचिव, महिला व बालविकास विभाग,यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई.
४. उपसचिव (श्री.चव्हाण),महिला व बालविकास विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
५. उपसचिव (श्री.हजारे),महिला व बालविकास विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
६. सर्व विभागीय उपआयुक्त,महिला व बालविकास विभाग.
७. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
८. सर्व बालविकास प्रकल्प अधिकारी (नागरी / ग्रामीण).
९. निवड नस्ती, कार्या.-८